राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मूलभूत/पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजूरी देण्याबाबत- सन २०२२-२३

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेवि-२०२२/प्र.क्र. १४३/का.९**
मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ३० मार्च, २०२३

**वाचा -**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र: ग्राक्षेवि- २०१५/प्र.क्र.७७/ का.९, दि.२२ सप्टेंबर, २०१५.
२) शासन पूरकपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.६/का.९, दि. ९ मार्च, २०१६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२२/ प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४ एप्रिल २०२२.
४) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२२/प्र.क्र.१४३/का-९ दि.३० डिसेंबर,२०२२.
५) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२०/प्र.क्र.६५/का-९ दि.१६ जानेवारी,२०२३.
६) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२२/प्र.क्र.१४३/का-९ दि.२४ जानेवारी,२०२३
७) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२२/प्र.क्र.१४३/का-९ दि.६ फेब्रवारी,२०२३
८) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२२/प्र.क्र.१४३/का-९ दि.२७ फेब्रवारी,२०२३
९) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२२/ प्र.क्र.१४३/ का.९, दि.१७ मार्च २०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन ग्रामीण भागात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमुहातील नागरिकांच्या जीवनमानाचा दर्जा उंचावण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील शासन पूरकपत्रान्वये, दि.२२ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील योजनेची कार्यपध्दती या शीर्षाखाली परिच्छेद (क) (iii) च्या पुढे परिच्छेद दाखल

करण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार मा. खासदार व आमदार तसेच जिल्हाधिकारी यांच्याकडून शासन मान्यतेसाठी प्राप्त ग्रामपंचायत प्रस्तावांना मंजूरी देऊन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित निधीतून उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीपैकी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्र विकास योजनेकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.८०.०० कोटी (अक्षरी रूपये ऐंशी कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी वित्त विभागाने वरील संदर्भ क्र.३ च्या दिनांक ४ एप्रिल २०२२ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार अर्थसंकल्पीत निधीच्या १०० टक्के प्रमाणात रू.८०.००/- कोटी (अक्षरी रूपये ऐंशी कोटी फक्त) एवढा निधी वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. त्यापैकी संदर्भ क्र.४ दि.३० डिसेंबर,२०२२ च्या शासन निर्णयान्वये रु.१.०० कोटी, सदंर्भ क्र.५ दिनांक १६ जानेवारी २०२३ च्या शासन निर्णयान्वये रू.२८,९४,१२७/-, संदर्भ क्र.६ दि.२४ जानेवारी,२०२३ च्या शासन निर्णयान्वये रु.२१ कोटी, संदर्भ क्र.७ दिनांक ६ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये रू.२५.४५ कोटी तर संदर्भ क्र.८ दिनांक २७ फेब्रुवारी २०२३ च्या शासन निर्णयान्वये रू.०.५५ कोटी तर शासन निर्णय दिनांक १७ मार्च २०२३ अन्वये रू.७.७० कोटी असे एकूण रू.५५,९८,९४,१२७/-एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता उपरोक्त रू.८०.०० कोटी निधीपैकी रू.५५,९८,९४,१२७/- वजा जाता एकूण रू.२४,०१,०५,८७३/- एवढा निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.

या योजनेकरिता मा.मंत्री /राज्यमंत्री / खासदार /आमदार तसेच संबधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त झालेल्या ग्रामपंचायतींचे प्रस्तावांवर / संदर्भावर निधीच्या उपलब्धतेनुसार शासन मान्यता प्राप्त झालेल्या विकासकामांना निधी वितरणाचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येतो. त्यानुसार या योजनेंतर्गत उपलब्ध निधमधून या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट-"अ"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे **एकूण रु.१०,५०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लक्ष फक्त)** इतका निधी अल्पसंख्याक ग्रामीण बहुल क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात येत आहे. सदर अनुदान संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांच्यामार्फत संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद / सार्वजनिक बांधकाम विभाग / सार्वजनिक बांधकाम जिल्हा परिषद यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

२. अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. सोबतच्या **परिशिष्ट -"अ"** मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा संबधिंत जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास, त्या बदल्यात इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात इतर काम करणे शक्य नसल्यास, त्यासाठी वितरीत केलेला निधी शासन जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व

वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद/ सार्वजनिक बांधकाम विभाग/सार्वजनिक बांधकाम जिल्हा परिषद यांना सुपूर्द करण्यात यावा.

३. ज्या विवक्षीत प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित ग्रामपंचायतींनी निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबंधित जिल्हाधिकारी /मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद/ सार्वजनिक बांधकाम विभाग/सार्वजनिक बांधकाम जिल्हा परिषद यांच्याकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर ग्रामपंचायतींनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या **परिशिष्ट -"ब"** मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च "मागणी क्र. झेड ई-१, २२३५ -सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य अनुदान, राज्य योजनांतर्गत योजना, ०१ अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (०१) अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (कार्यक्रम), (२२३५ बी ०८५) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

५. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या दि. ०४ एप्रिल २०२२ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे."

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३०१६४१५०६११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: CN = SARANGKUMAR VASANTRAO PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.30 16:47:29 +05'30'

**(सारंगकुमार पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मंबई,
३. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र शासन,
५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

७. संबधित जिल्हाधिकारी

८. संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१२. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१३. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

१४. अर्थसंकल्प शाखा (का.७), अविवि, मंत्रालय, मुंबई,

१५. निवडनस्ती (कार्यासन-९)

**शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. ग्राक्षेवि-२०२२/प्र.क्र.१४३/का-९, दिनांक ३० मार्च, २०२३**

**परिशिष्ट "अ"**

| अ.क्र | जिल्हा | तालुका | क्रमांक | ग्रामपंचायत | विकास कामाचे नाव | निधी (लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | चंद्रपूर | नागभीड | १ | तळोधी (बाळापूर) | तळोधी (बाळापूर ) ग्रामपंचायत अंतर्गत मुस्लीम कब्रस्तान येथे संरक्षण भितीचे बांधकाम करणे | २०.०० |
| | | | २ | नांदेड | नांदेड मुस्लिम बहुल ग्रामपंचायत सामाजिक सभागृह बांधकाम करणे | ३०.०० |
| | | | ३ | कन्हाळगाव | कन्हाळगाव मुस्लिम बहुल ग्रामपंचायत अंतर्गत मुस्लिम कब्रस्तान येथे संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे. | १०.०० |
| | | | ४ | झाडबोरी | झाडबोरी मुस्लिम बहुल ग्रामपंचायत अंतर्गत मुस्लिम कब्रस्तान येथे संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे. | १५.०० |
| | | | | | **जिल्हा चंद्रपूर एकूण** | **७५.००** |
| २. | गडचिरोली | वडसा | ५ | विहीरगाव | मौजा ग्रा.प.विहिरगाव येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये सिमेंट रस्ते व नाली बांधकाम करणे | १०.०० |
| | | | ६ | बोळधा | मौजा ग्रा.प.बोळधा येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये सिमेंट रस्ते व नाली बांधकाम करणे | ०५.०० |
| | | आरमोरी | ७ | डोंगरगाव (भु.) | मौजा ग्रा.पं. डोंगरगाव (भु.) येथे शिख वस्तीमध्ये गुरूनानक समाज मंदिर बांधकाम करणे | १०.०० |
| | | | ८ | पिसेवडधा | ग्रा.पं. मौजा पिसेवडधा येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये सभामंडप बांधकाम करणे. | १०.०० |
| | | | ९ | इंजेवारी | ग्रा.पं. इंजेवारी मौजा पेटतुकूम येथे शिख समाज वस्तीमध्ये गुरुनानक समाज मंदिर व पेविंग ब्लॉक बांधकाम करणे | १०.०० |
| | | कुरखेडा | १० | गुरनोली | ग्रा.पं.मौजा गुरनोली येथे अल्पसंख्याक वसतीमध्ये सिमेंट रस्ते व नाली बांधकाम करणे. | १०.०० |
| | | | ११ | नान्ही | ग्रा.पं. मौजा नान्ही येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये सिमेंट रस्ते व नाली बांधकाम करणे | १०.०० |
| | | | १२ | गेवर्धा | ग्रा.पं. मौजा गेवर्धा येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये सिमेंट रस्ते व नाली बांधकाम करणे. | १०.०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | गडचिरोली | १३ | येवली | मौजा ग्रा.पं. येवली येथे मेन रोड पासून कब्रस्तानकडे जाणाऱ्या रस्त्यावर सी.सी.रोड बांधकाम करणे | १५.०० |
| | | | १४ | अमिर्झा | मौजा ग्रा.पं. अमिर्झा येथे मेन रोड पासून कब्रस्तानापर्यंत जाणाऱ्या रस्त्यावर सी.सी.रोड बांधकाम करणे. | ०५.०० |
| | | धानोरा | १५ | रांगी | मौजा ग्रा.प.रांगी येथे कब्रस्तानाला संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | चार्मोशी | १६ | घोट | मौजा ग्रा.पं. घोट येथे कब्रस्तानला संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | | १७ | आष्टी | मौजा ग्रा.पं. आष्टी येथे कब्रस्तानाला संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | धानोरा | १८ | कारवाफा | मौजा ग्रा.पं. कारवाफा येथे कब्रस्तानाला संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १५.०० |
| | | मुलचेरा | १९ | कोठारी | मौजा धन्नूर ग्रा.प.कोठारी येथे कब्रस्तानाला संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | | | | **जिल्हा गडचिरोली एकूण** | **१५०.००** |
| ३. | जळगाव | बोदवड | २० | लोणवाडी | मौजे लोणवाडी येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये पेव्हर ब्लॉक बसविणे | १०.०० |
| | | | २१ | जामठी | मौजे जामठी येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये कॉंक्रीटीकरण करणे | १०.०० |
| | | | २२ | येवती | मौजे येवती येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये शादीखाना हॉल बांधकाम करणे | १५.०० |
| | | | २३ | रेवती | मौजे रेवती येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये कॉंक्रिटीकरण करणे | ०५.०० |
| | | | २४ | शेलवड | मौजे शेलवड येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये कॉंक्रिटीकरण करणे | १०.०० |
| | | | २५ | वराड | मौजे वराड बु.येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये पेव्हर ब्लॉक बसविणे. | १०.०० |
| | | | २६ | जलचक्र बु. तांडा | मौजे जलचक्र बु. तांडा येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये कॉंक्रिटीकरण करणे | १०.०० |
| | | | २७ | शेलवड | मौजे शेलवड येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये पोहोच रस्ता पेव्हर ब्लॉक बसविणे | ०५.०० |
| | | चाळीसगाव | २८ | सायगाव | सायगाव येथे शादीखाना बांधकाम करणे. | २५.०० |
| | | | २९ | मेहुणबारे | मेहुणबारे येथे शादिखाना बांधकाम करणे | २५.०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | ३० | उंबरखेड | उंबरखेड येथे शादिखाना बांधकाम करणे | २५.०० |
| | | भुसावळ | ३१ | शिंदी | शिंदी ता. भुसावळ येथे उर्दु शाळेकडे जाणारा रस्त्यावर पुलाचे बांधकाम करणे | २०.०० |
| | | | ३२ | शिंदी | शिंदी ता. भुसावळ येथे अल्पसंख्याक वस्तीत कॉंक्रीटीकरण / पेव्हर ब्लॉंक बसविणे | १०.०० |
| | | | ३३ | सावतर निंभोरा | सावतर निंभोरा ता.भुसावळ येथे अल्पसंख्याक वस्तीत कॉंक्रीटीकरण / पेव्हर ब्लॉंक बसविणे | १०.०० |
| | | | ३४ | फेकरी | फेकरी ता.भुसावळ येथे अल्पसंख्याक वस्तीत कॉंक्रीटीकरण / पेव्हर ब्लॉंक बसविणे | १५.०० |
| | | | ३५ | खडका | खडका ता.भुसावळ येथे अल्पसंख्याक वस्तीत रस्ते कॉंक्रीटीकरण / पेव्हर ब्लॉंक बसविणे | २०.०० |
| | | | | | **जिल्हा जळगाव एकूण** | **२२५.००** |
| ४. | बीड | केज | ३६ | केज | केज, ता.केज येथील खानका येथे सभामंडप बांधणे | ०८.०० |
| | | | ३७ | आडस | आडस, ता.केज येथे मुस्लिम कब्रस्तान संरक्षक भिंत बांधणे. | १०.०० |
| | | अंबाजोगाई | ३८ | साकुड | साकुड, ता.अंबाजोगाई येथील पाचपीर दर्गा रस्ता खडीकरण व मजबुतीकरण करणे | १०.०० |
| | | | ३९ | अंबाजोगाई | अंबाजोगाई, ता.अंबाजोगाई येथील मक्का मस्जिद कब्रस्थान संरक्षक भिंत बांधणे | ०८.०० |
| | | | ४० | अंबाजोगाई | अंबाजोगाई, ता. अंबाजोगाई येथे भुईगल्ली कब्रस्थान संरक्षक भिंत बांधणे | ०५.०० |
| | | | ४१ | अंबाजोगाई | अंबाजोगाई ता.अंबाजोगाई येथे खुरेशी कब्रस्थान संरक्षक भिंत बांधणे | ०८.०० |
| | | | ४२ | अंबाजोगाई | अंबाजोगाई, ता.अंबाजोगाई येथे दर्गा सय्यद सादात, कब्रस्थान संरक्षक भिंत बांधणे | ०८.०० |
| | | | ४३ | अंबाजोगाई | अंबाजोगाई, ता.अंबाजोगाई येथे मौलाआली दर्गा संरक्षक भिंत बांधणे | ०८.०० |
| | | केज | ४४ | नांदूरघाट | नांदूरघाट ता.केज येथे शादीखाना बांधणे | १०.०० |
| | | | | | **जिल्हा बीड एकूण** | **७५.०** |
| ५. | औरंगाबाद | गंगापूर | ४५ | वाळुज | मौजे वाळुज अरबी मदरसा मध्ये पेव्हर ब्लॉंक बसविणे | ३५.०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | ४६ | वाळुज | मौजे वाळुज येथील मुस्लिम समाजाच्या दफन भूमीचे सुशोभिकरण व निवारा शेड बांधकाम करणे | ४०.०० |
| | | | | | **जिल्हा औरंगाबाद एकूण** | **७५.००** |
| ६. | धुळे | शिंदखेडा | ४७ | मालपूर | मौजे मालपूर येथे अल्पसंख्याक कब्रस्तानला कंपाऊंड करणे | १०.०० |
| | | | ४८ | निमगुळ | मौजे निमगुळ येथे अल्पसंख्याक कब्रस्तानला कंपाऊंड करणे | १०.० |
| | | | ४९ | मेथी | मौजे मेथी येथे अल्पसंख्याक कब्रस्तानला कंपाऊंड करणे | १०.०० |
| | | | ५० | चिमठाणे | मौजे चिमठाणे येथे अल्पसंख्याक कब्रस्तानला कंपाऊंड करणे | १०.०० |
| | | | ५१ | नरडाणा | मौजे नरडाणा येथे अल्पसंख्याक जैन सामाजिक सभागृह बांधकाम करणे | ३०.०० |
| | | | ५२ | चिमठाणे | मौजे चिमठाणे येथे अल्पसंख्याक पीर देवस्थान येथे पेव्हर ब्लॉक बसविणे. | ०५.०० |
| | | | | | **जिल्हा धुळे एकूण** | **७५.००** |
| ७. | नागपूर | कामठी | ५३ | बाबुळखेडा | मौजा बाबुळखेडा ता.कामठी जि.नागपूर येथे दहन /दफन भूमीचे सौंदर्यीकरण करणे | १५.०० |
| | | | ५४ | खापा (पाटन) | मौजा खापा (पाटन) ता. कामठी जि. नागपूर येथे दहन/ दफन भूमिचे सौंदर्यीकरण करणे | १५.०० |
| | | मौदा | ५५ | खात | मौजा खात ता. मौदा जि. नागपूर येथे दहन / दफन भूमीचे सौदर्यीकरणे करणे | १५.०० |
| | | कामठी | ५६ | रनाळा | मौजा रनाळा ता.कामठी येथे वार्ड क्र. १ सईद नगर ईस्माईल खान ते नासीर अंसार यांच्या घरापर्यंत खडीकरण करणे | १५.०० |
| | | मौदा | ५७ | तांडा | मौजा तांडा ता.मौदा जि. नागपूर येथे रमजान तुरक ते जिब्राईल शेख डेमन तांडेकर ते दुर्योधन निमकर यांच्या घरापर्यंत सिमेट रस्ता बांधकाम करणे | १५.०० |
| | | | | | **जिल्हा नागपूर एकूण** | **७५.००** |
| ८. | अकोला | तेल्हारा | ५८ | पंचगव्हाण | मौजे पंचगव्हाण ता.तेल्हारा येथे मुस्लिम समाजातील शादीखाना बांधकाम करणे | ४०.०० |
| | | | ५९ | हिवरखेड | मौजे हिवरखेड ता.तेल्हारा येथे मुस्लिम समाजाकरीता शादीखाना बांधकाम करणे | ३५.०० |
| | | | | | **जिल्हा अकोला एकूण** | **७५.००** |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९. | सातारा | सातारा | ६० | परळी | मौजे परळी येथे कब्रस्थानला संरक्षक भिंत बांधणे व पेव्हर ब्लॉंक बसविणे | २५.०० |
| | | | ६१ | गजवडी | मौजे गजवडी येथे कब्रस्थानला संरक्षक भिंत बांधणे व नमाज शेड बांधणे | २५.०० |
| | | | ६२ | करंजे | मौजे करंजे तर्फ परळी येथे कब्रस्थानला संरक्षक भिंत बांधणे | २५.०० |
| | | | | | **जिल्हा सातारा एकूण** | **७५.००** |
| १०. | नाशिक | मालेगाव | ६३ | दाभाडी | जमातखाना (सामाजिक सभागृह) बांधकाम करणे | ५०.०० |
| | | | ६४ | पाटणे | जमातखाना (सामाजिक सभागृह) बांधकाम करणे | २५.०० |
| | | | | | **जिल्हा नाशिक एकूण** | **७५.००** |
| ११. | रत्नागिरी | चिपळूण | ६५. | कालुस्ते खुर्द | कालुस्ते खुर्द मोहल्ला येथे मदरसा ते वडपाल रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | १०.०० |
| | | | ६६ | कुंभार्ली | कुंभार्ली मोहल्ला इक्बाल कडवेकर घर ते कब्रस्तान रस्ता कॉंक्रिटीकरण करणे | ०५.०० |
| | | | ६७ | अलोरे | अलोरे मराठी शाळा ते अलोरे मोहल्ला येथे सिध्दीक मुलाजी यांचे घराजवळ संरक्षण भिंत बांधणे | १०.०० |
| | | | ६८ | वेहेळ | वेहेळ खान मोहल्ला रस्ता मजबूतीकऱण व डांबरीकरण करणे | १०.०० |
| | | | ६९ | कालुस्ते | कालुस्ते खुर्द मोहल्ला उगाडी ते मदरसा ते वडपाल रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | १५.०० |
| | | संगमेश्वर | ७० | कडवई | कड़वई मोहल्ला ओकडेवाडी रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | १५.०० |
| | | | ७१ | चिखली | चिखली मोहल्ला रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे | १०.०० |
| | | | | | **जिल्हा रत्नागिरी एकूण** | **७५** |
| | | | | | **एकूण रूपये दहा कोटी पन्नास लक्ष फक्त** | **१०५०.००** |

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: CN = SARANGKUMAR VASANTRAO PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.30 16:47:54 +05'30'

**(सारंगकुमार पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०२२ /प्र.क्र.१४३ /का.९, दि. ३० मार्च, २०२३**

## परिशिष्ट - "ब"

## उपयोगिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. **ग्राक्षेवि २०२२/ प्र.क्र.१४३/ का.९, दि. ३० मार्च, २०२३** अन्वये वितरित केलेला रु. /- (अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष/ अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

**तपासणी केलेल्या दस्तऐवज /अभिलेखांचे प्रकार :-**

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| ग्रामविकास अधिकारी / ग्रामसेवक, संबंधित ग्रामपंचायत यांची स्वाक्षरी | मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br><br>तारीख<br><br>स्थळ<br><br>कार्यालय मुद्रा | नाव<br><br>तारीख<br><br>स्थळ<br><br>कार्यालय मुद्रा |

*****